**अनुसूचित जाती उपयोजनेअंतर्गत इतर मंत्रालयीन विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या सन २०२५-२६ मधील निधी वितरणाबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: विघयो-२०२५/प्र.क्र.५८/अर्थसंकल्प**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक :- १५ एप्रिल, २०२५

**वाचा:-** वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७ एप्रिल, २०२५

## परिपत्रक

केंद्र पुरस्कृत योजनांसंदर्भात केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला केंद्र हिश्याचा निधी व समरुप राज्य हिश्याचा निधी विहित मुदतीत सिंगल नोडल खात्यात वर्ग करण्याबाबत आवश्यक सूचना वित्त विभागाच्या दि.०५.१२.२०२३ च्या परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. तसेच केंद्र शासनाकडून प्राप्त निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झाल्याबाबत वित्त विभागाकडून ई-मेलद्वारे सर्व संबंधित विभागांना कळविण्यात येत आहे. यास अनुसरुन वित्त विभागाने दि.०७.०४.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांसाठी करण्यात आलेली मूळ अर्थसंकल्पीय तरतूद केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिस्सा सर्व मंत्रालयीन विभागांना बीम्स प्रणालीवर १०० टक्के उपलब्ध करण्यात आला आहे. त्यानुसार वित्त विभागाच्या दि.०७.०४.२०२५ च्या परिपत्रकास अनुसरुन अनुसूचित जाती उपयोजनेअंतर्गत केंद्र पुरस्कृत योजनांसाठी करण्यात आलेली मूळ अर्थसंकल्पीय तरतूद केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिस्सा अनुसूचित जाती उपयोजना राबविणाऱ्या सर्व मंत्रालयीन विभागांस बीम्स प्रणालीवर १००टक्के वितरीत करण्यात येत आहे. मागील वर्षामधील केंद्र शासनाचा निधी चालू वर्षी खर्च करावयाचा असल्यास त्यास सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य राहिल. केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत ज्या विभागाचे SNA खाते सुरु आहे त्या विभागाने सदर निधी विहीत मुदतीत SNA खात्यात वर्ग करण्याबाबत विभागाने दक्षता घ्यावी.

२. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झाल्याची खात्री करण्याबाबत वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय, दि.५ डिसेंबर, २०२३ मध्ये नमूद करण्यात आल्यानुसार कार्यवाही करण्यात यावी. यासाठी सन २०२५-२६ करिता केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिश्याचा निधी वितरणाची नस्ती सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास पाठविण्याची आवश्यकता नाही. केंद्र हिश्याच्या समरुप राज्य हिस्सा खर्च होईल, तसेच अनुसूचित जाती उपयोजनेचा निधी अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठीच खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०४१५१३०८४६०५२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2025.04.15 13:09:31 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती :-**

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संबंधित अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय,मुंबई
३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अनुसूचित जाती उप योजना राबविणारे सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग
५. निवडनस्ती (अर्थसंकल्प)